**राज्यातील केंद्र शासनाची कार्यालये, बँका, विमा कंपन्या, रेल्वे व इतर कार्यालये यांमध्ये त्रिभाषा सूत्राची काटेकोरपणे अंमलबजावणी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परिपत्रक क्र. मभावा-२०२५/प्र.क्र.९५/भाषा-२**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ मे, २०२५

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, मराठी भाषा विभाग क्र. मभावा-२०१६/प्र.क्र.८२/भाषा-२, दि. ०५.१२.२०१७
२. विभागाचे अर्धशासकीय पत्र क्र. मभावा-२०१८/प्र.क्र.१०९/२०१८/भाषा-२, दि. १०.०६.२०१९
३. शासन परिपत्रक, मराठी भाषा विभाग क्र. मभावा-२०१९/प्र.क्र.६६/भाषा-२, दि. ०६.११.२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ मधील तरतुदींनुसार "मराठी" ही राज्याची राजभाषा आहे. त्यामुळे महाराष्ट्र राज्यातील केंद्र सरकारची सर्व कार्यालये, बँका, विमा कंपन्या, रेल्वे इत्यादींमध्ये इंग्रजी व हिंदीसोबत मराठी भाषेचा वापर करणेबाबत वाचा येथील दि. ०५.१२.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर कार्यालयांमध्ये इंग्रजी व हिंदीबरोबरच मराठी भाषेच्या वापराबाबत पाठपुराव्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांकडे सोपविण्याबाबत दि. १९.०६.२०१९ रोजीच्या मा. मुख्य सचिव यांच्या स्तरावरील पत्रान्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

तसेच, त्रिभाषा सूत्रानुसार राज्यातील केंद्र शासनाची कार्यालये, बँका, विमा कंपन्या इ. कार्यालयांमध्ये मराठी भाषेच्या वापराबाबत जिल्हाधिकाऱ्यांनी कशा प्रकारे कार्यवाही करावयाची याबाबत देखील सर्वसमावेशक अशा सूचना वाचा येथील दि. ०६.११.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

तथापि, राज्यातील बँकिंग, दूरध्वनी, टपाल, विमा, रेल्वे, मेट्रो, मोनो-रेल, विमान प्रवास, गॅस, पेट्रोलियम, कराधान इ. सेवा पुरविणारी कार्यालये, केंद्र शासनाची अन्य कार्यालये इ. मध्ये त्रिभाषा सूत्रानुसार कार्यवाही होत नसलेबाबत अनेकदा शासनास विविध माध्यमांतून तक्रारी प्राप्त

होत असतात. याबाबत मा. लोकप्रतिनिधी यांचेमार्फत देखील वेळोवेळी सूचना करण्यात येतात. तसेच, याबाबत लेखा आक्षेप देखील उपस्थित करण्यात आलेला आहे. सबब, त्रिभाषा सूत्राच्या काटेकोर अंमलबजावणीच्या अनुषंगाने पुन:श्च एकदा सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

त्रिभाषा सूत्राच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने वाचा येथील शासनपत्र व परिपत्रके यांद्वारे देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या अखत्यारित येणाऱ्या जिल्ह्यातील केंद्र शासनाची सर्व कार्यालये, बँका, विमा कंपन्या, रेल्वे व अन्य कार्यालये यांमध्ये त्रिभाषा सूत्रानुसार मराठी भाषेचा वापर करण्यात येतो किंवा कसे, याबाबत पडताळणी करावी. सदर कार्यालयांमध्ये मराठी भाषेचा वापर करण्यात येतो  किंवा कसे, याबाबतचे स्वयंघोषणापत्र संबंधित कार्यालयाकडून विहित नमुन्यात घ्यावे. सदर स्वयंघोषणापत्र उपरोक्त नमूद कार्यालयांनी दर्शनी ठिकाणी सूचनाफलकावर प्रदर्शित केले आहे किंवा कसे, याबाबत देखील या कामासाठी जिल्हा व तालुका स्तरावर नेमलेल्या समन्वय अधिकाऱ्यांमार्फत आढावा घेण्यात यावा.

जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येते की, वाचा येथील दि. ०६.११.२०२० रोजीच्या परिपत्रकासोबतच्या तपासणी सूचीनुसार सदर स्वयंघोषणापत्र नसल्यास तपासणीसूचीनुसार स्वयंघोषणापत्र सादर करणेबाबत संबंधित कार्यालयाकडे पाठपुरावा करावा. तसेच, पी.जी पोर्टल व आपले सरकार प्रणाली व इतर माध्यमांतून मराठी भाषेचा वापर होत नसलेबाबत प्राप्त तक्रारींचे वेळीच निराकरण होण्याच्या अनुषंगाने देखील संबंधितांकडे पाठपुरावा करावा.

तपासणी सूचीतील सर्व मुद्दयांची पूर्तता करण्याच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांनी जिल्हा स्तरावरील पालकमंत्री किंवा लोकप्रतिनिधी यांच्या अध्यक्षतेखाली होणाऱ्या बैठकांना संबंधित केंद्र शासनाच्या कार्यालयांमधील कार्यालय प्रमुखांना आमंत्रित करुन त्रिभाषा सूत्रानुसार मराठी भाषेच्या वापराबाबत त्यांच्यामध्ये जागरुकता निर्माण करावी.

भाषा संचालक यांनी देखील वाचा येथील दि. ०६.११.२०२० रोजीच्या परिपत्रकासोबतच्या तपासणी सूचीनुसार सर्व मुद्दयांबाबतचा अहवाल सर्व जिल्हाधिकारी यांचेकडून प्राप्त होतो किंवा कसे, याबाबत आढावा घेऊन, ज्या जिल्हाधिकारी यांचेकडून तपासणीसूचीनुसार अहवाल प्राप्त होत नाही, त्यांचेकडे पाठपुरावा करुन सदर अहवाल प्राप्त करुन घ्यावा व विहित कालावधीमध्ये शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५२६१३१२४२७१३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMDEO KONDIBA BHOSALE

Digitally signed by NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT,
2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8C6A286229ECC7982A08553F49D547EF64BE25C7F26FC96324ECE7CCCBFEB8C5, cn=NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2025.05.26 13:13:22 +05'30'

**(डॉ. नामदेव भोसले)**
**(सह सचिव, महाराष्ट्र शासन)**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.सभापती महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य.
६) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास, गृह निर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा. उपमुख्यमंत्री (वित्त, नियोजन व राज्य उत्पादन शुल्क) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
९) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
१०) मा. मंत्री, मराठी भाषा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
१३) सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने),
१६) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),
१७) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने)
१८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानपरिषद /विधानसभा, विधानभवन, मुंबई.
१९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२०) आयकर आयुक्त, आयकर कार्यालय, मुंबई.
२१) मुख्य वाणिज्यिक व्यवस्थापन, मध्य रेल्वे मुख्य कार्यालय, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनल्स, मुंबई.
२२) मुख्य वाणिज्यिक व्यवस्थापक, पश्चिम रेल्वे मुख्य कार्यालय, चर्चगेट, मुंबई.
२३) मुख्य व्यवस्थापक, मुंबई मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लिमिटेड, ई ब्लॉक, वांद्रे-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई ४०० ०५१.

२४) सहायक संचालक, टपाल सेवा (तांत्रिक), मुख्य पोस्टमास्टर जनरल यांचे कार्यालय, मुंबई ४०० ००१
२५) मुख्य महाव्यवस्थापक, महानगर टेलिफोन निगम लि. मुंबई टेलिफोन हाऊस, वीर सावरकर मार्ग, दादर (पश्चिम), मुंबई ४०० ०२८.
२६) संचालक, भारत संचार निगम लि. केंद्रीय टेलिग्राफ हाऊस, मुंबई ४०० ००१.
२७) महाव्यवस्थापक, रिझर्व बँक ऑफ इंडिया, शहिद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई-४०००01
२८) महाव्यवस्थापक, नौपरिवहन कार्यालय, मुंबई-४०० ००१.
२९) संचालक, आण्विक ऊर्जा विभाग, अणुशक्ती भवन, एच.एस. मार्ग, कुलाबा, मुंबई- ४०० ०३९.
३०) संचालक, डायरेक्टर ऑफ कॉटन डेव्हलपमेंट, कृषि मंत्रालय, पहिला मजला, रामजी भाई कमानी मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८.
३१) व्यवस्थापक विभागीय पारपत्र कार्यालय, मनीषा कमर्शियल सेंटर, डॉ. ॲनी बेझंट मार्ग, वरळी, मुंबई-४०० ०२६.
३२) संचालक, रेडिओ केंद्र, आकाशवाणी भवन, जुन्या आमदार निवास समोर, मुंबई-४०० ०३२.
३३) महाव्यवस्थापक, सर्वसाधारण विमा योजना, सुरक्षा, १७०, जमशेदजी टाटा रोड, चर्चगेट, मुंबई- ४०० ०२०.
३४) संचालक, भाषा संचालनालय, मुंबई.
३५) महाव्यवस्थापक, आयुर्विमा महामंडळ, योगक्षेम, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०.
३६) व्यवस्थापक एअर इंडिया, एअर इंडिया बिल्डींग, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.
३७) व्यवस्थापक, तेल व नैसर्गिक वायू महामंडळ, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.
३८) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३९) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
४०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४२) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४३) निवडनस्ती (भाषा-२)